**<u>ॲड.श्री.राजा ठाकरे यांना व्यावसायिक फी प्रदान करण्याबाबत....</u>**
**चतु:श्रृंगी पो.स्टे., पुणे गु.र.क्र. ३२५/२०२१ अन्वये दाखल गुन्ह्यातून उद्भवलेल्या न्याय प्रकरणात मा. उच्च न्यायालय, मुंबई येथील कामकाजाकरीता.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :-एसपीपी-०६२२/प्र.क्र.१४०/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
२ रा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १६ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ:-** (१) विधि व न्याय विभाग, शासन पत्र क्र.३८/२०६१/एसपीपी/२०२३/'अ' शाखा दि.१७.१०.२०२३.
(२) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दि. २९.०७.२०१५.
(३) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दि.१६.०६.२०१७.

**शासन निर्णय :-**

चतु:श्रृंगी पो.स्टे., पुणे गु.र.क्र. ३२५/२०२१ अन्वये दाखल गुन्ह्यातून उद्भवलेल्या न्याय प्रकरणात मा. उच्च न्यायालय, मुंबई या न्यायालयातील न्यायालयीन कामकाज शासनाच्या वतीने पाहण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून संदर्भाधीन क्र.१ अन्वये नियुक्त ॲड.श्री.राजा ठाकरे यांना खालील प्रमाणे फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी- रू. ३,००,०००/- (अक्षरी रुपये तिन लाख फक्त)

विचारविनिमय फी/प्रतितास/तासाचा भाग-रु.५०,०००/-(अक्षरी रुपये पन्नास हजार फक्त)

सदर फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ॲड.श्री.राजा ठाकरे यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकाकडून तपासून, प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त/ पोलीस अधिक्षक यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्रमांक बी-१, २०५५ पोलीस -(००)१०९, जिल्हा पोलीस (००)(०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८)- २८ व्यावसायिक सेवा" या

लेखाशीर्षाखालील त्या-त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

**४.** प्रस्तुत शासन निर्णय संदर्भ क्र. २ व ३ वरील वित्त विभाग शासन निर्णयानुसार मा. उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालयात न्यायालयीन प्रकरणी नेमण्यात आलेल्या विशेष सरकारी अभियोक्त्यांना फी अदा करण्यासंदर्भात प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र. २०२४०८१६१७१२१५३२२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MURLIDHAR MADANRAO MUNDE

Digitally signed by MURLIDHAR MADANRAO MUNDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=282312ebca8590dedb8028575064d7754a3c5702d668b43d226ef7b32ee3a517, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=716527D5A822F9E40134FCE6C6C6B8E1521D5C66E1D2D46A3F04B04DE16DF388, cn=MURLIDHAR MADANRAO MUNDE
Date: 2024.08.16 17:26:42 +05'30'

**( मुरलीधर मुंडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) पोलीस आयुक्त, पुणे शहर.
३) सहाय्यक पोलीस आयुक्त, हडपसर विभाग, पुणे शहर.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर/१/२, महाराष्ट्र राज्य.
५) अधिदान व लेखा कार्यालय, पुणे.
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, पुणे.
७) ॲड. श्री. राजा ठाकरे, ३०१, मारुती मॅन्शन, १७, रघुनाथ दादाजी स्ट्रीट, फोर्ट, मुंबई.
८) कार्यासन अधिकारी (का-१४), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) कार्यासन अधिकारी (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती (पोल-१०)